NEHRU BAL PUSTAKALAYA

# सूर्यफुले आणि फुलपाखरे




जयंती मनोकरन

अनुवाद : वत्सला शिरोडकर

चित्रे : सुजाशा दास गुप्ता

ISBN 81-237-2872-7
पहिली आवृत्ती : 1999 (शके *1921*)
दुसरी आवृत्ती : 2001 (शके *1922*)
तिसरी आवृत्ती : 2003 (शके *1924*)
चौथी आवृत्ती : 2004 (शके *1926*)

रु. 15.00
Sunflowers And Butterflies (*Marathi*)
संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया
ए-5 ग्रीन पार्क, नवी दिल्ली-110 016 यांनी प्रकाशित केले.

नेहरू बाल पुस्तकालय

# सूर्यफुले आणि फुलपाखरे



जयंती मनोकरन

अनुवाद : वत्सला शिरोड़कर

चित्रे : सुजाशा दास गुप्ता



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया



"सापडलं रे सापडलं!" भान हरपून कांचन उद्गारली. तिथे गुलाबी रंगाच्या सुवासिक गुलाबाचं रोपटं होतं, त्यावर बसलेल्या एका मोठ्या नारिंगी, पांढऱ्या पट्टेरी फुलपाखरावर तिने झडप घातली. तिथे तजेलदार पांढरी लिली, पॉपीची गडद लाल रंगाची फुले आणि चमचमती पिवळी धमक सूर्यफुले होती. अन् सगळीकडे फुलपाखरंच फुलपाखरं!



कांचन आपल्या हाताकडे पाहते तर काय? परत ते निसटून गेलं होतं. "अशीच लपतछपत गेले, तर मला हे अगदी मिळेलच," असे मनाशी म्हणत, ती हलक्या पावलांनी शेपूट असलेले फुलपाखरू धरायला झुकली. आता अगदी त्यावर झेप घालणार, इतक्यात तेही फुलपाखरू तिच्या तावडीतून सुटून, दूर तरंगत निघून गेलं. कांचनने रागारागाने पाय आपटले.

“हा! हा!” तिचा लहान भाऊ मोहन हसला. “मुली फुलपाखरं कधीच पकडू शकत नाहीत!” तो नेहेमीच तिला चिडवत असे.

कांचन मनात म्हणाली, “ध्यान बघा खुळोबाचं. इनमीन दोन फुलपाखरं धरलीत, तर असा काही नाचत सुटलाय जशी वीस धरलीन्!”

“कसला खुळचट खेळ आहे,” कांचन बोलली आणि खांदे उडवीत, नाकाचा शेंडा वर करून ती चालायला लागली.







कांचन आपल्या अंगणातील पायरीवर, हनुवटीवर हात टेकवून बसली होती. तिला वाईट वाटत होतं. मोहनच्या आगाऊपणामुळे तर ती अधिकच रडवेली झाली होती. तिने आजूबाजूला बघितलं. बागेतील झगझगीत रंगांनी तिची नजर वेधून घेतली. फुलपाखरांपेक्षाही ते रंग तेजस्वी अन् मनमोहक होते. ती सूर्यफुले होती. त्यांच्या झळाळीने जणू सारं जग उजळून निघालं होतं.

सूर्यफुलांचं चित्र रंगवलं तर खरी गंमत येईल. सोपं तर आहेच. म्हणून कांचनने चटकन् एक कागदाचा मोठा ताव आणि रंग आणले. एका झपक्यात तिने पाकळ्यांना पिवळा रंग दिला अन् मधोमध परागांना काळा रंग दिला. मग ती जरा मागे उभी होऊन आपले चित्र निरखू लागली.

"मी आजवर काढलेल्या चित्रांत हे चित्र फारच छान आलंय! जणू खरीखुरीच फुलं आहेत!" तिला वाटलं.

ही! ही! करून मोहन खिदळत होता. कांचनने तिकडे लक्षच दिलं नाही.

ती आपले चित्र टक लावून पाहत बसली होती. ती सजीव, सुंदर सूर्यफुलं! सोनेरी उजेडाने जणू त्यांनी जग नाहून टाकलं होतं. आपण एक चित्रकार आहोत, तिला जाणवलं! बागेतून एक हलकीशी वाऱ्याची झुळूक आली. पानांचा सळसळाट करत निघून गेली.



तिथे एक फुलपाखरू फडफडत आले आणि सूर्यफुलावर बसले. ते फूल तिच्या चित्रातले होते. कांचनने अजिबात न हलता डुलता आपला श्वास रोखून धरला.

"धरू का हे?" तिला मोह झाला. त्याच्या काळ्या पंखांवर डोळ्यांसारखे लाल, पांढरे ठिपके होते. पंखांची उघडझाप करून, ते जणू आपली शोभा मिरवीत होते.



कांचनला आपल्या पाठीवर काहीतरी हलकंसं जाणवलं. सरकत सरकत ते तिच्या हनुवटीशी हुळहुळू लागलं. तिने वळून पाहिलं...



तिथे दुसरं फुलपाखरू! आणि मग तिसरं! अशी खूप सारी सभोवार विहरत होती. कांचन हरखून गेली. किती हळूहळू ती फुलपाखरं अवतीभवती उडत होती! त्यांच्याशी तिची मैत्री झाली. आता ती त्यांना मुळीच धरणार नाही.

तिने टुणकन् उडी मारली आणि दुसरा कागदाचा ताव घेतला. आपल्याला सूर्यफुलं रंगवता येतात, तर या लाघवी फुलपाखरांचं चित्रंही खचित रंगवता येईल.

कांचनने ठळक रेषांनी चित्र काढले. त्यात तिने चमकते रंग भरले. पंखांना सोनेरी आणि हिरवा रंग देऊन तिने रंगीबेरंगी सुरेख फुलपाखरू रंगविले.





तिने रंगविलेले फुलपाखरू जणू तिच्या नजरेसमोर बागडत होते. ते वर उडाले आणि आपल्या नाजूक पंखांनी उंचावर गिरक्या घेऊ लागले. तिच्या समोरून ते हळूच एकदा फडफडून गेले. कांचन कुतुहलाने डोळे विस्फारून पाहतच राहिली. ते जणू मोठमोठे होत, आणखी मोहकपणे झगमगत होते.

एका वेगळ्याच धुंदीत कांचनच्या मनांने भरारी घेतली. त्या धुंदीमध्ये ती, त्या सुंदर पंखांवर बसून उंचावर तरंगत जाऊ लागली.





कांचनचे फुलपाखरू वळणदार मऊ कुरणांवरुन जाऊ लागले. वाऱ्याबरोबर जसेकाही ते संथपणे वाहत जात होते. उंच हिवराच्या रांगातून वाट काढत ते एका रमणीय बागेत पोहोचले.



जिकडेतिकडे लहानमोठे, रंगीबेरंगी गुलाब फुललेले होते. फळांनी झाडे लदबदलेली होती. सूर्यकिरणांत मोर नाचत होते. तळ्यात राजहंस पोहत होते. कारंजातून फवारे उडत होते. सोनेरी उजेडात कमळे झळकत होती.



आणि थेट पुढेच एक भव्य संगमरवरी राजवाडा होता. त्याला कमानदार खिडक्या आणि उंच सुबक खांब होते. बघावे तिथे माणसेच माणसे—बायका पुरुषांनी सुंदर भरजरी कशिदा काढलेली, रेशमी आणि साटीनची वस्त्रे नेसली होती.

एका सेवकाने वाकून कांचनला मुजरा केला. तो म्हणाला, “राजकुमार मोहन आपली वाट पाहत आहेत.”



कांचन थक्क झाली. तिला ऐकलेले खरेच वाटेना. आपला भाऊ राजकुमार! ती नवलाने इकडेतिकडे बघत त्या सेवकाच्या मागोमाग संगमरवरी पायऱ्या चढून गेली.





राजकुमार मोहन सोनेरी सिंहासनावर विराजमान होता. गालिचा घातलेल्या एका भल्या मोठ्या दिवाणखान्यात तो ऐसपैस, किनखापी लोडाला टेकून बसला होता. जवळच दोन तबके होती. एकात फळे तर दुसऱ्यात रुचकर मिठाई होती. राजकुमाराने रेशमी अंगरखा घातला होता. त्याच्या मंदिलावर तुरा आणि मोती जडविलेला शिरपेच होता.



राजकुमार अरेरावीने बोलला, "मला कळलंय की ह्या देशातलं सर्वात मोठं फुलपाखरू तुला सापडलंय. ते मला हवंय." एका उडीत तो दडादडा पायऱ्या उतरु लागला.

कांचन त्याच्या मागे धावली. "थांब," ती म्हणाली, "मला त्यावर बसून घरी जायचय. आई वाट पाहतेय. तू का नाही येत माझ्याबरोबर?"

राजकुमार गोंधळलेला दिसला. मग म्हणाला, "ठीक आहे," आणि दोघेही फुलपाखरावर स्वार झाली.

आकाशात उंचावर गिरक्या घेत घेत, ते परत आपल्या सूर्यफुलांच्या चमकदार बागेत अलगद येऊन ठेपले.




ती दोघे फुलपाखरावरून उतरली,
तोच अचानक ते दूर दूर जाऊं लागले.

मोहन ओरडला, "पकड ते. त्याला जाऊ देऊ नकोस!" त्याने उडी मारली आणि फुलपाखराचे पंख खेचले—आणि ते तुटले.





कांचन किंचाळली! आई धावत आली. तिने मोहनच्या हातातून ते फाटलेले चित्र घेतले आणि ते जुळवून चिकटवले. मग तिने ते सूर्यफुलांच्या चित्राजवळ ठेवले. कांचनने आनंदाने चित्राकडे बघितले. मग मोहनचा हिरमुसलेला चेहरा पाहिला.

तिने दुसरा एक कागद घेतला. "मी चित्र रेखाटते हं. तू रंग दे," ती आपल्या भावाला म्हणाली.

आधी मोहन टवकारून बघत होता. मग त्याला हसू फुटलं, आणि दोघंही मिळून हसू लागले. कांचनने चित्र काढलं आणि ते मोहनने रंगवलं, वा! हे केवढं छानदार चित्र जमलं!

